**उच्चस्तरीय सचिव समितीने मंजूर केलेल्या कामातील वृक्षलागवड बाबीचे कार्यान्वयन...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: बीडीजी-२०२५/प्र.क्र.१३/इमा-१**
मादाम कामा मार्ग, राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक :४ एप्रिल, २०२५

## परिपत्रक

मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीमार्फत रु १५ कोटी रकमेवरील किंमतीच्या इमारती बांधकामांना मान्यता प्राप्त झाल्यावरच संबंधित विभागामार्फत प्रशासकीय मान्यता देण्यात येते. उच्चस्तरीय सचिव समितीने दिनांक ७ मार्च, २०२५ रोजीच्या बैठकीत मान्य केलेल्या प्रस्तावात इमारतीच्या आवारात वृक्ष लागवडीस उपकाम स्वरुपात मान्यता देण्यात आलेली आहे. त्याबाबत पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी:-

१) उच्चस्तरीय सचिव समितीच्या मंजूर इतिवृत्तानुसार उपकामाची रक्कम तात्काळ संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करावी.
२) इमारतीची जोतापातळी पूर्ण झाल्यावर वृक्षलागवडीचे काम करण्यात यावे. झाडांच्या भारतीय प्रजाती इमारतीपासून सुरक्षित अंतरावर लावाव्या.
३) वृक्षलागवडीसोबत तीन वर्षांच्या सुरक्षेची व देखभालीची रक्कम उच्चस्तरीय सचिव समितीने मंजूर केली आहे. त्यानुसार वृक्षाची उंची व खोडाची जाडी असावी.
४) इमारत पूर्ण होतांना झाडांची सुरुवातीची वाढ होणे अपेक्षित आहे. त्यामुळे झाडे लावताना किमान ८/१० फुटांपेक्षा जास्त उंचीची झाडे लावावीत.
५) बांधकामादरम्यान निरीक्षण टिप्पणीत झाडांच्या लागवडीबद्दल निरीक्षण करणाऱ्या अधिकाऱ्यांनी त्यांचे अभिप्राय नमूद करावेत.
६) इमारत हस्तांतरीत होतांना संबंधित प्रशासकीय विभागास किती व कोणती झाडे लावण्यात आली, त्याचा गोषवारा द्यावा.
७) संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी प्राप्त निधी व खर्चाचा संपूर्ण लेखाजोखा ठेवावा. वृक्ष लागवडीचे काम ज्या ज्या टप्प्यावर पूर्ण होईल त्याप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र (Utility Certificate) सादर करावे व त्याची एक प्रत उपभोक्ता खात्यास देण्यात यावी.

**२.** इमारतीचे बांधकाम पर्यवेक्षण करणाऱ्या स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक ते मुख्य अभियंता यांनी वृक्षलागवडीचे व संवर्धनाचे काम सामाजिक बांधीलकीच्या दृष्टीने हाताळावे असे सुचित करण्यात येत आहे.

**३.** सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०४१७१८०१६०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DIPALI PRADEEP GHORPADE

Digitally signed by DIPALI PRADEEP GHORPADE
DN: c=IN, o=PERSONAL, title=2574, pseudonym=42119cf54e494087b5182b557516d201, 2.5.4.20=8fdc37406c155f20f5ae0988e9a1c7b6a744659f8b36110f5f0f8280ca07337d, postalCode=415519, st=Maharashtra, serialNumber=c5855ef7a773be6fd8251ed7d445fc477ec7a301e0a190847d151267a928a7ff, cn=DIPALI PRADEEP GHORPADE
Date: 2025.04.04 17:19:20 +05'30'

( **दिपाली प्रदीप घोरपडे** )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,

२. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळे,

३. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४. निवडनस्ती